Indian Institute of Surveying & Mapping (HSM) UPPAL, Hyderabad **येथिल ट्रेनिंगसाठी निधी उपलब्ध करुन मिळण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : राभूअ -२०१८/ प्र.क्र.२०२/ ल-१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा चौक

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

दिनांक : ९ मार्च, २०२०

**वाचा** -१) शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग टीआरएन-०९/ प्र.क्र. ३९/१२अ दि. २३/०९/ २०११

२) महसूल व वन विभाग, शा.नि.क्र.संकीर्ण-२०११/२१०३/प्र.क्र.६१८/ल-१, दि.०६.१०.२०१५.

३) जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख (म.राज्य), पुणे यांचे पत्र क्र.पु.मो.-१/प्र.क्र. ६७/२०१८, दि.०३/०१/२०१८ व दि.२५/०५/२०१८ चे प्रस्ताव.

**प्रस्तावना**

राष्ट्रीय भूमी अभिलेख आधूनिकीकरण कार्यक्रमांतर्गत राज्यातील ग्रामीण भागातील जमीनींची पुनर्मोजणी व नकाशांचे डिजिटायझेशन करण्याबाबतचा शासन निर्णय संदर्भिय क्र.२ येथील दि.०६.१०.२०१५ अन्वये निर्गमित करण्यात आला आहे. सदर शासन निर्णयातील तरतूदीनुसार पुनर्मोजणी प्रकल्पाच्या पहिल्या टप्प्यात प्रत्येक महसूली विभागात एक जिल्हा याप्रमाणे पुणे, नाशिक, औरंगाबाद, अमरावती व नागपूर या ६ जिल्ह्यांमध्ये राबविण्यास मान्यता देण्यात आली आहे.

२ सदर पुनर्मोजणी प्रकल्पासाठी तांत्रिकदृष्ट्या कुशल अधिकारी निर्माण करणे व पुनर्मोजणीच्या आधुनिक पध्दतींचा अभ्यास करण्याच्या उद्देशाने पूनर्मोजणी प्रकल्पासाठी आवश्यक असणाऱ्या विषयांबाबत प्रशिक्षण कार्यक्रम आयोजित करणे आवश्यक आहे. सदर प्रशिक्षण कार्यक्रम **सर्व्हे ऑफ इंडिया** (SoI), Indian Institute of Surveying & Mapping, **हैद्राबाद या** प्रशिक्षण संस्थेने आयोजित केला आहे. सदर प्रशिक्षण कार्यक्रमामध्ये विभागातील अधिका-यांना भूमापनाच्या आधुनिक पद्धतींची माहिती होणार असून भविष्यामध्ये या पद्धतींचा उपयोग मोजणी, पुनर्मोजणी भूसंपादन मोजणी, गावठाण मोजणी, नगर भूमापन मोजणी इत्यादी कामामध्ये होणार आहे. त्याचप्रमाणे विभागातील अधिका-यांच्या तांत्रिक क्षमतेमध्ये निश्चितपणे वाढ होईल. त्यामुळे भूमि अभिलेख विभागातील अधिकाऱ्यानां प्रशिक्षणासाठी पाठविणे योग्य होईल. पुनर्मोजणीची कार्यवाही जरी खाजगी संस्थांकडून करण्याचे प्रस्तावित असले तरी विभागातील अधिका-यांना याबाबतची माहिती असणे आवश्यक आहे. तसेच खाजगी संस्थेकडून केलेल्या पुनर्मोजणी कामाची विविध स्तरावर तपासणी करून ते विभागामार्फत प्रमाणित करणे आवश्यक आहे.

३. उपरोक्त नमुद प्रशिक्षणासाठी **सर्व्हे ऑफ इंडिया** (SoI), Indian Institute of Surveying & Mapping, **हैद्राबाद या** प्रशिक्षण संस्थेने ९ आठवड्यांचा प्रशिक्षण कार्यक्रम हा दि. २३/०३/२०२० ते दि. २८/०५/२०२० (४५ दिवस) या कालावधीत आयोजित केला असून, सदर प्रशिक्षण कार्यक्रमासाठी एकूण ५० अधिकारी यांना प्रत्येकी रु.५३,८२६/- याप्रमाणे एकूण रु.२६,९१,३००/- इतका निधी राज्य शासनाच्या प्रशिक्षणासाठीच्या (२०५२ ५२०५) (००)(०१) प्रशिक्षण या लेखाशिर्षामधून उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

राज्यातील ग्रामीण भागातील जमीनींची पुनर्मोजणी व नकाशांचे डिजिटायझेशन करण्याबाबतच्या दि.०६.१०.२०१५ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार पुनर्मोजणी प्रकल्पाच्या पहिल्या टप्प्यात प्रत्येक महसूली विभागात एक जिल्हा याप्रमाणे पुणे, नाशिक, औरंगाबाद, अमरावती व नागपूर या ६ जिल्ह्यांमध्ये राबविण्यास मान्यता देण्यात आली आहे.

२. राज्यातील ग्रामीण भागातील जमीनींची पुनर्मोजणी प्रकल्पासाठी आवश्यक असणाऱ्या विषयांबाबत प्रशिक्षण देण्याची निकड, सदर प्रशिक्षणाकरिता उपलब्ध असलेला निधी, या बाबी विचारात घेऊन भूमि अभिलेख कार्यालयातील एकूण ५० अधिकाऱ्यांना दि. २३/०३/२०२० ते २८/०५/२०२० या कालावधीत प्रशिक्षण देण्यासाठी आवश्यक असलेला निधी सन २०१९-२० या आर्थिक वर्षासाठी राज्य प्रशिक्षण धोरणांतर्गत, महसूल विभागाकरीता प्रशिक्षणासाठी मुख्यलेखाशिर्ष (२०५२ ५२०५) (००) (०१) शासकीय अधिकाऱ्यांना प्रशिक्षण या लेखाशिर्षांतर्गत मान्य करण्यास खालीलप्रमाणे अटींच्या अधीन राहून मंजूरी देण्यात येत आहे.

१. भूमि अभिलेख विभागाकरिता सदर प्रशिक्षणासाठी रक्कम रुपये २६,९१,३००/- (रुपये सव्वीस लाख एक्क्याण्णव लाख तीनशे फक्त) मर्यादेत खर्च करण्यास शासन मंजुरी देत आहे. सदर प्रशिक्षण शासनाने विहीत केलेल्या संदर्भ क्र. १ च्या कार्यपध्दतीनुसार करण्यात यावे.

२. या प्रयोजनासाठी जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे.

३. यासाठी होणारा खर्च मागणी क्रमांक सी-४, ००,००३, प्रशिक्षण (००) (००) (१) शासकीय कर्मचाऱ्यांना प्रशिक्षण (अनिवार्य) (२०५२ ५२०५) या लेखाशीर्षाखाली सन २०१९-२०२० या वित्तीय वर्षात मंजूर योजनेतर तरतुदीमधून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००३०९१६४८०८२२१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Santosh Haridasrao Bhogle

Digitally signed by Santosh Haridasrao Bhogle
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cfe36679ae12922422bc5e7f7d277841f1fe67725f465c272fd6727259260b3d, cn=Santosh Haridasrao Bhogle
Date: 2020.03.09 16:52:25 +05'30'

**(डॉ.संतोष भोगले)**
**उपसचिव**
**महसूल व वन विभाग**

**प्रत –**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव.
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
३. मा. मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव.
४. मा. राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव.
५. मा. मुख्य सचिव यांचे उपसचिव.
६. अप्पर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग.

७. सर्व विभागीय आयुक्त
८. जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे
९. नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे
१०. सर्व जिल्हाधिकारी.
११. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र १ व २, मुंबई/नागपूर
१२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १ व २, मुंबई/नागपूर
१३. कोषागार अधिकार, पुणे
१४. वित्त विभाग, कार्यासन क्र. व्यय १०/अर्थसंकल्प ६, मंत्रालय, मुंबई
१५. माहिती तंत्रज्ञान संचालनालय, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
१६. माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई (५ प्रती प्रसिध्दीकरीता)
१७. निवड नस्ती, ल-१.